**राज्यातील न्यायालयांना सोयी-सुविधा निर्माण करुन देण्याच्या अनुषंगाने, “Court Infrastructure Policy” (न्यायालयांकरिता पायाभूत सुविधा धोरण) यातील मुद्यांमध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-१६१५/प्र.क्र.२२०/भाग-१/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३० ऑगस्ट, २०१८.

वाचा :-

१) मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र.२३९/२००९ @ जनहित याचिका क्र.१०/२००८ @ रिट याचिका क्र.५१०१/२०१२ संदर्भात दि.०७ व १३ ऑगस्ट, २०१५ रोजी दिलेले आदेश.
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-१६१५/प्र.क्र.२२०/का-१३, दि.२९ ऑक्टोबर, २०१५.
३) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-१६१५/प्र.क्र.२२०/का-१३, दि.१० डिसेंबर, २०१५.
४) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-१६१५/प्र.क्र.२२०/का-१३, दि.०३ फेब्रुवारी, २०१६.
५) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-१६१५/प्र.क्र.२२०/भाग-१/का-१३, दि.१० ऑक्टोबर,२०१६.

प्रस्तावना:-

राज्यातील न्यायालयांना सोयी-सुविधा निर्माण करुन देण्याच्या अनुषंगाने, न्यायालयांकरिता पायाभूत सुविधा धोरण संदर्भाधीन क्र.५ मधील शासन निर्णय दि.१० ऑक्टोंबर, २०१६ अन्वये निर्गमित करण्यात आले आहे. न्यायालयांशी संबंधित विविध मुद्यांबाबत मा.उच्च न्यायालय येथे दाखल असलेली जनहित याचिका क्र.१५६/२०११ प्रकरणी वेळोवेळी सुनावणी घेण्यात आली. सदर याचिकेसोबत न्यायालयांशी संबंधित इतरही याचिकांवर एकत्रितपणे सुनावणी होऊन मा.उच्च न्यायालयाने दि.५ मे,२०१७ रोजीच्या आदेशानुसार न्यायालयांकरीता पायाभूत सुविधा धोरण” मधील मुद्दा "ख" मधील अनुक्रमांक १ ते ४ व १३, तसेच धोरणात्मक तरतूदीतील मुद्दा क्र.१० मधील अनुक्रमांक १०.२ च्या अनुषंगाने आवश्यक सुधारणा करण्यासंदर्भात राज्य शासनाने निर्णय घेण्याबाबत आदेश दिले होते. मा.उच्च न्यायालयाच्या या निर्णयाच्या अनुषंगाने दि.७ ऑगस्ट, २०१८ रोजी मा.मंत्रीमंडळ बैठकीमध्ये चर्चा होऊन न्यायालयांकरीता पायाभूत सुविधा धोरणामधील मुद्दा "ख" मधील अनुक्रमांक १ ते ४ व १३ व धोरणात्मक तरतूदीमधील मुद्दा १० मधील मुद्दा क्र.१०.२ मध्ये सुधारणा करण्याच्या प्रस्तावास

मा.मंत्रीमंडळाने मान्यता दिली आहे. सदर निर्णयाप्रमाणे सुधारीत धोरण निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील न्यायालयांना सोयी-सुविधा निर्माण करुन देण्याच्या अनुषंगाने, राज्यात नव्याने बांधावयाच्या न्यायालयीन इमारती व न्यायाधीश निवासस्थाने, तसेच अस्तित्वातील इमारतींचे विस्तारीकरण, दुरुस्ती धोरणामधील **परिशिष्ट-अ** मधील "न्यायालयांकरिता पायाभूत सुविधा धोरण", **मुद्दा ख-**प्रकल्पाची संकल्पना आखण्यापासून ते प्रकल्प पूर्ण करण्यापर्यंतचे टप्पे या मधील अनुक्रमांक १ ते ४ व १३ व धोरणात्मक तरतूदीतील मुद्दा क्र.१०- विद्यमान इमारतींमध्ये दुरूस्त्या करणे किंवा त्यामध्ये भर घालणे आणि त्यामध्ये फेरबदल करणे यासाठी मान्यता यातील अनुक्रमांक १०.२ च्या अनुषंगाने सोबतच्या परिशिष्ट "अ" प्रमाणे सुधारणा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१८०८३१११४००६७७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.08.31 11:44:35 +05'30'

**(अमोघ. श्या. कलोती)**
**विधी सल्लागार-नि-सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
४) मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई.
८) प्रबंधक (निरीक्षणे-२ ), उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई.
९) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
१०) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
११) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
१२) उपसचिव (सेवा) यांचे स्वीय सहाय्यक, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) उपसचिव (वित्त)/उपसचिव (नियोजन)/उपसचिव (इमारती)(सा.बां.वि.), मंत्रालय, मुंबई.
१४) महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
१६) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७) सरकारी वकील, उच्च न्यायालय, अपील शाखा, रिट सेल, मुंबई-३२.
१८) अवर सचिव / कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने.
१९) निवडनस्ती / संग्रहार्थ कार्यासन-१३.

**Annexure – A**

**COURT INFRASTRUCTURE POLICY**

**B. Stages from conceptualization to the completion of the project:-**

1. Initiation of the proposal by the Principal District Judge / Judge to construct a new court complex / residential quarter or redevelop the existing one.

2. Local Public Works department shall prepare the plan / design of said building within a period of two months from receipt of proposal from Principal District Judge / Judge.

3. The Chief Architect / Deputy Chief Architect, Government of Maharashtra shall vet and approve the design within one month thereafter.

4. The local Public Works Department (with the approval / sanction of the Executive/ Superintending / Chief Engineer, Public Works Department) shall prepare the final plans / estimates within three months thereafter.

13. Concurrence of the Committee of the Secretaries headed by the Hon'ble Chief Secretary, if the estimate is above rupees Fifteen Crores.

**POLICY INITIATIVES**

**10. Approval to the work of repairs or addition and alterations to the existing buildings:-**

10.2 It is, therefore, proposed that the Principal District Judges / Judges may be invested with authority to incur expenditure for repairs / additions / alterations out of the grant made available under the head of Office Expenses, up to Rupees 50 lakhs per year for Bigger Judicial districts i.e. Mumbai, Thane, Pune, Aurangabad, Nashik, Nagpur and Amaravati and upto Rupees 30 lakh per year for the other Judicial districts.

The proposal for incurring expenditure for repairs and / or alterations shall, however, be forwarded by the Principal District Judges / Judges to the High Court administration and after approval by the High Court, the estimates be forwarded to the State Government and the Head of Department may be invested with the authority to sanction the expenditure for repairs / addition / alterations up to the upper limit of rupees 30 lakhs and 50 lakhs for smaller Judicial districts and the above referred bigger Judicial districts, respectively, per year.

-------

परिशिष्ट-अ

## न्यायालयांकरिता पायाभूत सुविधा धोरण

**ख) प्रकल्पाची संकल्पना आखण्यापासून ते प्रकल्प पूर्ण करण्यापर्यंतचे टप्पे :-**

१. सुरुवातीला नवीन न्यायालयीन संकुलाचे / निवासस्थानांचे बांधकाम किंवा विद्यमान इमारतींचा पुनर्विकास करण्यासाठी मुख्य जिल्हा न्यायाधीश / न्यायाधीश यांनी प्रस्तावित करणे.

२. मुख्य जिल्हा न्यायाधीश/ न्यायाधीश यांच्याकडून न्यायालयीन संकुल/ निवासस्थानांचा किंवा विद्यमान इमारतींचा पुनर्विकास करण्याचा प्रस्ताव स्थानिक सार्वजनिक बांधकाम विभागास प्राप्त झाल्यानंतर, स्थानिक सार्वजनिक बांधकाम विभागाने **दोन महिन्यामध्ये** सदर इमारतीच्या बांधकामाचा आराखडा/ संकल्पचित्र तयार करावे.

३. त्यानंतर मुख्य वास्तुविशारद/ उप मुख्य वास्तुविशारद, महाराष्ट्र शासन यांनी **एका महिन्यामध्ये** प्रस्तावित इमारतीचे संकल्पचित्र तपासून/ पुनर्विलोकन करुन मान्यता द्यावी.

४. तद्‌नंतर स्थानिक सार्वजनिक बांधकाम विभागाने **तीन महिन्यामध्ये** अंतिम आराखडे/ अंदाजपत्रके तयार करावीत (कार्यकारी अभियंता/ अधीक्षक अभियंता/ मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या मान्यतेने / मंजूरीने)

१३. प्रस्तावाचे अंदाजपत्रक रुपये पंधरा कोटींपेक्षा अधिक रकमेचे असल्यास, मुख्य सचिव अध्यक्ष असलेल्या सचिव समितीची सहमती घेणे.

**धोरणात्मक तरतूदी**

**१०. विद्यमान इमारतींमध्ये दुरुस्त्या करणे किंवा त्यामध्ये भर घालणे आणि त्यामध्ये फेरबदल करणे यासाठी मान्यता. -**

१०.२ म्हणून असे प्रस्तावित करण्यात आले आहे की, “२७-लहान बांधकामे” या लेखाशीर्षाअंतर्गत मोठे न्यायिक जिल्ह्ये जसे मुंबई, ठाणे, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नाशिक, नागपूर याकरीता प्रत्येक वर्षी रुपये ५० लाखाच्या मर्यादेपर्यंत व इतर न्यायिक जिल्ह्यांकरीता प्रत्येक वर्षी रुपये ३० लाखाच्या मर्यादेपर्यंत दुरुस्त्या/भर घालणे/फेरबदल करणे या कामावर खर्च करण्याचे अधिकार प्रधान जिल्हा न्यायाधीश/ न्यायाधीश यांच्याकडे सोपविण्यात यावेत. तथापि, दुरुस्त्या आणि / किंवा फेरबदल यांच्यावर करण्यात येणाऱ्या खर्चाचे प्रस्ताव प्रधान जिल्हा न्यायाधीश/ न्यायाधीश हे उच्च न्यायालय प्रशासनाला पाठवील, आणि उच्च न्यायालयाने मान्यता दिल्यानंतर, असे अंदाजपत्रक राज्य शासनाकडे पाठविण्यात येतील व मोठे न्यायिक जिल्ह्ये जसे मुंबई, ठाणे, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नाशिक, नागपूर याकरीता प्रत्येक वर्षी रुपये ५० लाखाच्या मर्यादेपर्यंत व इतर न्यायिक जिल्ह्यांकरीता प्रत्येक वर्षी रुपये ३० लाखाच्या मर्यादेपर्यंत यासाठीच्या खर्चास मंजूरी देण्याचे अधिकार विभाग प्रमुखास सोपविण्यात येतील.